महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे जानेवारी, २०२२ च्या वेतनासाठी रु.२३०.०० कोटी इतका निधी वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसटीसी-०१२२/प्र.क्र.२४/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ :-**

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.रा.प./लेखा/अंववि/५१/, दि.०७.१.२०२२.

**प्रस्तावना ;-**

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये हिवाळी अधिवेशन २०२१-२२ मध्ये मागणी क्रमांक बी-३, २०४१, वाहनांवरील कर ००,००१,संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली मंजूर रू. ११५०.०० कोटी इतक्या पुरवणी मागणी मधून रु. २००.०० कोटी निधी माहे डिसेंबर च्या वेतनासाठी वितरित करण्यात आला असून उर्वरित रु. ९५०.०० कोटी निधी महामंडळातील कर्मचाऱ्यांच्या जानेवारी २०२२ ते मार्च २०२२ महिन्याच्या वेतनासाठी वितरित करण्याची शासनास विनंती केली आहे. वित्त विभागाने सध्या रु. २३०.०० कोटी इतका निधी राज्य परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे जानेवारी, २०२२ च्या वेतनासाठी वितरित करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार प्रस्तुत रू. २३०.०० कोटी इतकी रक्कम रा.प. महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे जानेवारी, २०२२ च्या वेतनासाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या माहे जानेवारी, २०२२ च्या वेतनासाठी हिवाळी अधिवेशन सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर झालेल्या रू.११५०.००कोटी रक्कमेच्या पुरवणी मागणीमधील शिल्लक रु. ९५०.०० कोटी इतक्या रक्कमेतून रू.२३०.०० कोटी (अक्षरी रूपये दोनशे तीस कोटी फक्त) एवढी रक्कम रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रू.२३०.०० कोटी हा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च “मागणी क्रमांक बी-३, लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर (००) ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३०/व्यय-८/२०२२, दि.२८.१.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२०२१८१५१५१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MINAKSHI DEVIDAS KARHADE

Digitally signed by MINAKSHI DEVIDAS KARHADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT(TRANSPORT), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0ea81113f6df694c04d4b835d0f3328844e438498d9d1d7bcfcc2bf1f5abf98a, pseudonym=3ECC0123EF2E9557142DB57330C5E392065C2897, serialNumber=64757C0F2E9C5E56362BC8E7A79ABEE993C28EBD3D21BC22D37A4D8E12AD1CB3, cn=MINAKSHI DEVIDAS KARHADE
Date: 2022.02.02 18:16:59 +05'30'

**( मिनाक्षी कऱ्हाडे )**

कक्ष अधिकारी, गृह (परिवहन) विभाग,

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
९) मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
१०) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१६) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
१७) निवडनस्ती/परि १.